नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा
विषयक योजनेसाठी (SRE)
निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एनएएक्स-०५१९/प्र.क्र.१०१/विशा- १ ब,**
दुसरा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- १६ मार्च, २०२०.

वाचा-१) शासन निर्णय गृह विभाग क्र.- एनएएक्स-०५१९/प्र.क्र.१०१/विशा- १ ब, दि. २८/८/२०१९.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा. पत्र क्र.- पोमसं/२१-अ/१९५/SRE Scheme/६०/२०१९, दि. ३०/११/२०१९.

**प्रस्तावना-**

नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च या योजनेअंतर्गत नक्षलवादी हिंसाचारात शहीद होणारे पोलीस अधिकारी / कर्मचारी आणि नागरिकांना सानुग्रह अनुदान, आत्मसमर्पित नक्षलवाद्यांना अर्थसहाय्य, पोलीस अधिकारी / कर्मचारी यांचा विमा, जन संपर्क कार्यक्रम व प्रचार कामासाठी अर्थ सहाय्य देणे आवश्यक असल्याने पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई / विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षल विरोधी अभियान, नागपूर यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च (Security Related Expenditure) योजनेअंतर्गत नक्षलग्रस्त भागासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेला कार्यक्रम राबविण्यासाठी रु. २३,०४,००,०००/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी चार लक्ष मात्र) रकमेच्या खर्चास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर मंजूरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

(अ) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत केला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

(ब) सदर रक्कम संकीर्ण देयकांवर काढता येणार नाही. तसेच पुनर्विनियोजनही करता येणार नाही. त्यामुळे सदर निधी दि. ३१/३/२०२० पूर्वी खर्च करण्याची जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ विशेष पोलीस महानिरीक्षक नक्षल विरोधी अभियान, नागपूर यांची राहील.

३. यासाठीचा खर्च मागणी क्र.- बी-१, २०५५, पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०८) नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च, योजनेतर (६० टक्के केंद्र पुरस्कृत कार्यक्रम), ५० इतर खर्च (२०५५ ०४८२) या लेखा शिर्षाखाली सन २०१९ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे बाब क्र. १० अन्वये मंजूर झालेल्या निधीतून करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.- १२५/व्यय-७, दि.१३/३/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१६१७५६४३०८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shirish Nagorao Mohod

Digitally signed by Shirish Nagorao Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66fda7e745bb4928b21046cecbf7bd8f40e4950e0a99497fa2862e1d37ed75b7, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Nagorao Mohod
Date: 2020.03.16 18:00:09 +05'30'

**( शिरीष मोहोड )**
उप सचिव, गृह विभाग.

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
३. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षल विरोधी अभियान), नागपूर.
५. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर.
६. पोलीस अधिक्षक, गडचिरोली / गोंदिया.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकरी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली / गोंदिया.
१०. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी, व्यय-७/अर्थोपाय/अर्थ-११, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संग्रहार्थ नस्ती / निवडनस्ती (वि.शा. १ ब).